~~२०१९~~

२०११०५१०१६३०३५००१

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात
जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण
अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत
नागपूर व उल्हासनगर महानगरपालिकेच्या
ई-गव्हर्नन्स प्रकल्पास निधी वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्र.एनयुआर-२०१०/प्रक्र-२८५/१०/नवि-३३

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**

**दिनांक : ३१ मार्च, २०११**

संदर्भ: केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाचे आदेश क्र. एफ-१९ (१)/पीएफ-१/२०१०-१०२, दिनांक ११ मे,२०१०.

प्रस्तावना : नागरीकरणाचा वाढता वेग व व्याप्ती विचारात घेवून केंद्र शासनाने देशातील ६३ शहरांमध्ये पायाभूत सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी "जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान" हा महत्वाकांक्षी कार्यक्रम दिनांक ३ डिसेंबर,२००५ रोजी जाहीर केला आहे.

उक्त कार्यक्रमाअंतर्गत पिंपरी चिंचवड, नागपूर व उल्हासनगर महानगरपालिकेच्या मंजूर शहर विकास आराखड्यासंबंधातील सविस्तर प्रकल्प अहवाल जे राज्यस्तरीय सुकाणु समितीच्या मान्यतेने केंद्र शासनाच्या अंतिम मंजुरीसाठी "नोडल एजन्सी" (MMRDA) मार्फत सादर करण्यात आले होते. त्यांस केंद्र शासनाच्या केंद्रीय मंजुरी समिती (Central Sanctioning Committee) ने मंजुरी दिली असून संदर्भाधिन केंद्र शासनाच्या आदेशान्वये अतिरिक्त रक्कम वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. सदर मंजुरीनुसार उक्त योजनेच्या (JNNURM) मार्गदर्शक तत्वानुसार राज्य शासनाच्या हिश्श्याची रक्कम खालील तक्त्याप्रमाणे आहे :-.

(रुपये लाखात )

| अ. क्र. | महानगरपालिकेचे नांव | प्रकल्पाचे नांव | प्रकल्प किंमत | केंद्र शासनाचा हिस्सा | राज्य शासनाचा सध्या वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | नागपूर | ई-गव्हर्नन्स | १३४५.२५ | ६७२.६३ | ६७.२६ |
| २ | उल्हासनगर | ई-गव्हर्नन्स | ५६२.१९ | १९६.७७ | २१.०८ |
| 3 | पिपरी चिचवड | ई-गव्हर्नन्स | ९२४ | ४६२ | ४६.०० |
| | | | | एकूण : | १३४.३४ |

शासन निर्णय :

जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियान अंतर्गत मंजूर आकृतीबंधानुसार राज्य शासनाकडील हिस्सा नागपूर महानगरपालिकेकरीता रुपये ६७.२६,०००/-, उल्हासनगर महानगरपालिकेकरीता रुपये २१,०८,०००/- व पिंपरी चिंचवड महानगरपालिकेकरीता रु.४६,००,०००/- वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. केंद्र शासनाने आपल्या आदेशात सदर रक्कमा अनुदानस्वरुपात संस्थेस त्वरीत वितरीत कराव्यात असे नमूद केलेले आहे. **सदर रकमेचे वितरण अनुदान** म्हणून करण्यात येत आहे. त्यानुसार खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार **रुपये एक कोटी , चौतीस लाख** चौतीस हजार फक्त (रुपये १.३४.३४,०००/- **फक्त** ) इतका निधी वितरीत करण्यासाठी मंजूरी देण्यात येत आहे आणि यासाठी श्री.का.तु. सातकर, उपसचिव, नगर विकास विभाग यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे व श्री.आ.रा. राजपूत, कक्ष अधिकारी, नगरविकास विभाग यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी **रुपये एक कोटी , चौतीस** लाख ,चौतीस हजार फक्त (**रुपये १,३४,३४,०००/- फक्त** ) इतक्या रकमेचा धनादेश जेएनएनयुआरएम फंड ("JNNURM Fund") या नावाने काढावा व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे (राज्यस्तरीय नोडल एजन्सी) सुपूर्त करावा. राज्यस्तरीय नोडल एजन्सीने सदर रकमांचे वितरण नागपूर, उल्हासनगर व पिंपरी चिंचवड महानगरपालिकेस तात्काळ करावे.

(रुपये लाखात )

| अ. क्र. | महानगरपालिकेचे नाव | प्रकल्पाचे नांव | प्रकल्प किंमत | केंद्र शासनाचा हिस्सा | राज्य शासनाचा सध्या वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | नागपूर | ई-गव्हर्नन्स | १३४५.२५ | ६७२.६३ | ६७.२६ |
| २ | उल्हासनगर | ई-गव्हर्नन्स | ५६२.१९ | १९६.७५ | २१.०८ |
| ३ | पिंपरी चिंचवड | ई-गव्हर्नन्स | ९२४ | ४६२ | ४६.०० |
| | | | | एकूण : | १३४.३४ |

०१ नागपूर, उल्हासनगर व पिंपरी चिंचवड महानगरपालिकेने त्रिपक्षीय करारनाम्यात नमूद केलेल्या सुधारणांबाबत वर्षनिहाय केलेली प्रगती पाहून तसेच वितरित केलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र दिल्यानंतरच सदर योजनेअंतर्गत केंद्र शासनाचा पुढील हिस्सा वितरित करण्यात येईल. नागपूर, उल्हासनगर व पिंपरी चिंचवड महानगरपालिकेस सदर प्रकल्पासाठी वितरित करण्यात येणारी रक्कम पहिल्या हप्त्यापोटी वितरित करण्यात येत आहे.

०२ केंद्र शासनाकडून प्रत्यक्ष पाहणीद्वारे या योजनेअंतर्गत प्रकल्पाच्या अंमलबजावणीचा नागरी सुधारणा क्षेत्रातील प्रगतीचा आढावा घेण्यात येईल. नागपूर, उल्हासनगर व पिंपरी चिंचवड

महानगरपालिकेने दर तीन महिन्यांनी राज्यस्तरीय नोडल एजन्सीमार्फत केंद्र शासनाच्या हिश्याच्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचा अहवाल राज्य शासन तसेच, केंद्र शासनास सादर करावा. अशाप्रकारे तिमाही अहवाल मागून त्यांना [illegible] झाल्यास त्यांना पुढील हिस्सा प्रलंबित विनियोग अहवाल प्राप्त होईपर्यन्त वितरित करण्यात येणार नाही.

१४. प्रस्तुत योजनेअंतर्गत सर्व प्रकल्पांची अंमलबजावणी पूर्ण झाल्यानंतर या योजनेमधून काय साध्य झाले याबाबतचा अहवाल महानगरपालिकेने राज्य शासन व केंद्र शासनास सादर करावा.

१५. नागपूर, उल्हासनगर व पिंपरी चिंचवड महानगरपालिकेस अनुदान म्हणून देण्यात येणा-या रुपये एक कोटी चौतीस लाख ,चौतीस हजार फक्त (रुपये १,३४,३४,०००/- फक्त ) इतक्या रकमेचा खर्च हा मागणी क्र. एफ-२, २२१७, नगर विकास, ~~८०-सर्वसाधारण~~, १९१- महानगरपालिकांना सहाय्यक अनुदान (००) (५४)जवाहरलाल नेहरू राष्ट्रीय नागरी पुनर्निर्माण अभियानांतर्गत, नगर - विकासाकरीता सहाय्य (राज्य हिस्सा) (२२१७२२२४) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)"या लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ या चालू आर्थिक वर्षी मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

१६. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३५९/११/अर्थ-१६, दिनांक २४/३/२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

( रा. वि. कुलकर्णी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति --
१) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-१ , मुंबई
२) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)- २ , मुंबई
३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५) प्रधान सचिव, वित्त / प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) नोडल एजन्सी तथा महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई
७) आयुक्त, पिंपरी चिंचवड / नागपूर /उल्हासनगर महानगरपालिका
८) रोखशाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९) उप सचिव ( नवि-३३ ) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
१०) सहसचिव (नवि-५) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
११) निवडनस्ती (नवि-३३).

I:\Home\CDP\CR 285-10- NAGPUR.ULHASNAGAR.EGOV.Grant GR